**ई-फेरफार व ई-चावडी प्रकल्प राज्यात राबविण्याकरीता ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) व मंडळ अधिकारी यांना डेटा कार्ड वापरासाठी प्रती डेटा कार्ड दरमहा रू.७५०/- या प्रमाणे माहे एप्रिल २०२४ ते मार्च २०२५ या कालावधीतील अदा शुल्काची प्रतिपुर्ति निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२५/प्र.क्र.२०१ (भाग-१)/ल-१**

पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२
तारीख: २८ मार्च, २०२५

**वाचा -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. राभूअ-२०१२/प्र.क्र.४६७/ल-१, दि.२८.०१.२०१३
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२०९/ल-१, दि. ०२.०९.२०२०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४६/ल-१, दि. १९.०३.२०२१
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४६/ल-१, दि. २२.०३.२०२१
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१, दि. ३१.०३.२०२३
६)शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१, दि. २२.०३.२०२४
७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१, दि. ०४.१०.२०२४
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र: राभू- १ /डाटाकार्ड /२०२५ दि. २५.०३.२०२५

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाचा राष्ट्रीय भूमि अभिलेख आधूनिकीकरण कार्यक्रम राज्यात ई-महाभूमि या नावाने राबविण्यात येत असून त्या अंतर्गत ई-चावडी, (गाव दप्तराचे संगणकीकरण) व ई-फेरफार (फेरफार प्रक्रीयेचे संगणकीकरण) प्रकल्प राज्यभरात राबविण्यात येत आहे. ई-फेरफार व ई-चावडी या प्रकल्पाची संपूर्ण राज्यात अमंलबजावणी करण्याकरीता मंडळ अधिकारी व ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) यांचेकडील लॅपटॉप स्टेट डेटा सेंटरवरील सर्व्हर बरोबर जोडणी करण्यासाठी डेटा कार्डव्दारे कनेक्टिव्हीटी स्थापित करणे अनिवार्य आहे. त्याअनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये ई- महाभूमि अंतर्गत ई- फेरफार व ई- चावडी आज्ञावलीच्या अंमलबजावणीसाठी राज्यातील संबंधित मंडळ अधिकारी/ ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) यांच्या लॅपटॉपची स्टेट डेटा सेंटरवरील सर्व्हर बरोबर जोडणी करण्यासाठी डेटा कार्डव्दारे कनेक्टिव्हीटी स्थापित करण्यासाठी तसेच ई-फेरफार व ई-चावडी आज्ञावलीमध्ये एस.एम.एस. वापरासाठी डाटाकार्ड करीता दरमहा रु.

७५०/- प्रमाणे प्रतिपूर्ती स्वरुपात शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.६ अन्वये माहे एप्रिल २०२३ ते मार्च,२०२४ या कालावधीसाठी डेटा कार्ड शुल्क अदा करण्यासाठी रू.१२,००,००,०००/- (अक्षरी बारा कोटी फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यात आली होती. माहे एप्रिल, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीत ई-फेरफार प्रकल्प सुरळीतपणे सुरू राहण्यासाठी संबंधित मंडळ अधिकारी व ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) यांना दरमहा रु. ७५०/- प्रमाणे निधीच्या उपलब्धततेनुसार एकूण रु.४,९३,६२,४२५/- (अक्षरी चार कोटी, त्र्यान्नव लक्ष, बासष्ट हजार, चारशे पंचवीस फक्त) इतका निधी डेटा कार्ड शुल्काच्या प्रतिपूर्तीसाठी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१. ई-महाभूमि अंतर्गत ई-फेरफार व ई-चावडी या आज्ञावलीच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यातील संबंधित तलाठी व मंडल अधिकारी यांच्या लॅपटॉपची स्टेट डेटा सेंटरच्या सर्व्हरमधील आज्ञावलीशी इंटरनेटव्दारे कनेक्टिव्हिटी स्थापित करण्यासाठी तसेच ई-फेरफार व ई-चावडी आज्ञावलीमध्ये एसएमएस वापरासाठी डेटा कार्ड करीता प्रतिपूर्ती स्वरूपात प्रतिडेटा कार्ड रूपये ७५०/- दरमहा याप्रमाणे माहे एप्रिल, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीकरीता एकूण रु.४,९३,६२,४२५/- (अक्षरी चार कोटी त्र्यान्नव लक्ष, बासष्ट हजार, चारशे पंचवीस फक्त) इतका निधी सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख म.राज्य पुणे यांचेकडील स्टेट बँक ऑफ इंडिया च्या पुणे येथील मुख्य शाखेतील बचत खाते क्रमांक ११०९९४५३३१९ मध्ये जमा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य पुणे यांनी डेटा कार्ड धारण करणा-या पात्र ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) व मंडळ अधिकारी यांना प्रतिपूर्ती स्वरूपात हा निधी जिल्हाधिकारी यांचेकडे वितरीत करावा.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. सी.१, २०२९ जमीन महसुल १०३, जिल्हा भूमि अभिलेख (०२) संचालक भूमि अभिलेख २०२९ ०४२२ (१७) संगणक खर्च (योजनेतर)" या लेखाशिर्षा खाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातुन खर्ची टाकण्यात यावा.

४. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म. राज्य), पुणे यांनी सदर निधी आहरित करून त्यांचेकडील स्टेट बँक ऑफ पुणे येथील मुख्य शाखेतील बचत खाते नंबर क्रमांक ११०९९४५३३१९ मध्ये जमा करणेची त्वरीत कार्यवाही करावी. जिल्हाधिकारी यांनी सदर निधीचे विनियोगासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच

खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देणेची दक्षता घ्यावी. प्रस्तुत निधीबाबत जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१४५८३१३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.28 14:59:58 +05'30'

(संजय बनकर)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री [नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.)] यांचे सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त, नियोजन, राजु उत्पादन शुल्क) यांचे सचिव.
५. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
७. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव.
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व जिल्हाधिकारी.
१२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
१४.कोषागार अधिकार, पुणे.
१५.वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई.
१६. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती, ल-१.

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२५/प्र.क्र.२०१ (भाग-१)/ल-१ सोबतचे परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | कार्यरत तलाठी/मंडळ अधिकारी यांची संख्या | मागणी रक्कम | वितरीत करण्यात येणारी रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | कोल्हापूर | २५० | १७५०४२५ | ७४१०६२ |
| २ | नाशिक | नाशिक | ७३० | ६५७०००० | २७८१४८४ |
| ३ | | अहिल्यानगर | ८७० | ७८००००० | ३३०२२१९ |
| ४ | | धुळे | ३९६ | २८४४००० | १२०४०४० |
| ५ | | नंदुरबार | २५६ | २२८७५०० | ९६८४३९ |
| ६ | | जळगाव | ६८५ | ६१६५००० | २६१००२३ |
| ७ | कोकण | मुंबई उपनगर | ४६ | ३९०००० | १६५१११ |
| ८ | | ठाणे | २८९ | २६०१००० | ११०११६३ |
| ९ | | पालघर | ३१० | २७९०००० | ११८११७८ |
| १० | | रायगड | ४२७ | ३८४३००० | १६२६९७८ |
| ११ | | रत्नागिरी | ४०९ | ३१७२५०० | १३४३११४ |
| १२ | | सिंधुदुर्ग | ३२३ | २९०७००० | १२३०७१२ |
| १३ | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर | ५४४ | ४८९६००० | २०७२७७७ |
| १४ | | बीड | ४९० | ४४१०००० | १८६७०२४ |
| १५ | | जालना | ३७७ | ३३९३००० | १४३६४६५ |
| १६ | | धाराशिव | ३७३ | ३३५७००० | १४२१२२४ |
| १७ | | लातूर | ४०३ | ३६२७००० | १५३५५३२ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १८ | | नांदेड | ६३४ | ५७०६००० | २४१५७०० |
| १९ | | परभणी | ३३६ | ३०२४००० | १२८०२४५ |
| २० | | हिंगोली | २६० | २३४०००० | ९९०६६६ |
| २१ | अमरावती | अमरावती | ६०६ | ५२६०५०० | २२२७०९३ |
| २२ | | अकोला | ३५३ | ३१७७००० | १३४५०१९ |
| २३ | | यवतमाळ | ७२४ | ६५१६००० | २७५८६२३ |
| २४ | | बुलढाणा | ६०६ | ५४५४००० | २३०९०१३ |
| २५ | | वाशीम | ३०५ | २७४५००० | ११६२१२७ |
| २६ | नागपूर | नागपूर | ६०७ | ५४६३००० | २३१२८२३ |
| २७ | | चंद्रपूर | ४७२ | ४२४८००० | १७९८४३९ |
| २८ | | गडचिरोली | २८४ | २०८५००० | ८८२७०९ |
| २९ | | भंडारा | २५९ | २३३१००० | ९८६८५५ |
| ३० | | गोंदिया | २६४ | २३२९५०० | ९८६२२० |
| ३१ | | वर्धा | ३४६ | ३११४००० | १३१८३४७ |
| | एकूण | | १३२३४ | ११६५९६४२५ | ४९३६२४२५ |

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E5680DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.28 15:00:25 +05'30'

(संजय बनकर)

सहसचिव, महाराष्ट्र शासन